**कॉलेज ऑफ फायर इंजिनियरींग अँड सेफ्टी मॅनेजमेंट, औरंगाबाद (संस्था क्रमांक ०७०४), इंडियन फायर सर्व्हीस इंजिनियरींग अँड सेफ्टी मॅनेजमेंट, औरंगाबाद (संस्था क्र. १४०१) आणि सहयाद्री कॉलेज ऑफ फायर इंजिनीयरीग अँड सेफ्टी मॅनेजमेंट, नाशिक (संस्था क्र.१००७) या संस्थांच्या जागेत बदल करण्यास शासन मान्यता देणेबाबत.**

**महाराष्ट्र शासन**
**उच्च व तंत्र शिक्षण विभाग**
**शासन निर्णय क्र. मान्यता-२०१७/(प्र.क्र. ७२/१७)/तांशि-५**
मादाम कामा मार्ग, हुतात्मा राजगुरू चौक,
मंत्रालय विस्तार भवन, मुंबई-४०० ०३२.
दिनांक : २५ एप्रिल, २०१७

**संदर्भ** :- संचालक, महाराष्ट्र राज्य तंत्र शिक्षण मंडळ, मुंबई यांचे क्र.मरातंशिमं/का-५३/जागाबदलाबाबत/२०१७/८६६३, दिनांक २१ मार्च, २०१७ रोजीचे पत्र.

**प्रस्तावना :-**

महाराष्ट्र राज्य तंत्रशिक्षण मंडळाचे अखत्यारीत असलेल्या चंद्रलोप शिक्षण प्रसारक मंडळाचे कॉलेज ऑफ फायर इंजिनियरींग अँड सेफ्टी मॅनेजमेंट, औरंगाबाद (संस्था क्रमांक ०७०४), विश्व बहुउद्देशिय सेवाभावी संस्थेचे इंडियन फायर सर्व्हीस इंजिनियरींग अँड सेफ्टी मॅनेजमेंट कॉलेज, औरंगाबाद (संस्था क्र. १४०१) आणि कै.डी.आर.एच. शिक्षण प्रसारक संस्था कळवणचे सहयाद्री कॉलेज ऑफ फायर इंजिनीयरीग अँड सेफ्टी मॅनेजमेंट, नाशिक (संस्था क्र.१००७) या तीन संस्थांनी संलग्नतेसंदर्भात मा.उच्च न्यायालय, औरंगाबाद खंडपीठ येथे अनुक्रमे याचिका क्र. ७४३३/२०१६, ७५३३/२०१६ आणि ७५५८/२०१६ दाखल केलेल्या होत्या.

सदर न्यायालयीन प्रकरणांच्या अनुषंगाने मा.उच्च न्यायालयाच्या दिनांक ३१/०८/२०१६ च्या आदेशानुसार Non-AICTE अभ्यासक्रम राबविणाऱ्या सदर संस्थांच्या जागा बदला बाबतची तपासणी करण्याचे आदेश देण्यात आलेले होते. महाराष्ट्र राज्य तंत्र शिक्षण मंडळाचे विभागीय कार्यालय, औरंगाबाद यांचेमार्फत या संस्थांच्या जागा बदलाच्या अनुषंगाने त्रिसदस्यीय समिती गठीत करुन तपासणी करण्यात आली. चौकशी समितीने सदर संस्थांबाबतचा समाधानकारक अहवाल असल्याचे कळविले आहे.

सदर याचिकांवरील सुनावणी मा.उच्च न्यायालयात होऊन प्रस्तुत प्रकरणी मा.उच्च न्यायालयाने दिनांक १०/२/२०१७ रोजी सदर संस्थांनी केलेल्या संस्थांच्या जागा बदलास मान्यता दिलेली आहे.

**शासन निर्णय :-**

उपरोक्त वस्तुस्थिती तसेच मा.उच्च न्यायालयाचे न्यायनिर्णय विचारात घेता **सदर** तीन संस्थांनी खालील तक्त्यात नमूद केल्यानुसार संस्थांच्या केलेल्या जागा बदलास शासनाची कार्योत्तर मान्यता देण्यात येत आहे.

| अ.क्र. | संस्थेचे नाव व संस्था कोड क्रमांक | संस्थेचा पूर्वीचा पत्ता | संस्थेचा नवीन पत्ता |
|---|---|---|---|
| १. | Chandralop Shikshan Prasarak Mandals College of Fire Engineering and Safety Management, Instt Code. 0704 | Plot No. 3, N-7 Opp.Garware Ltd., Gate No.1, Jalgaon Road, Aurangabad. | Survey No., Gut No. 52, Village-Tuljapur, Harsul Sawangi, Jalgaon Road, Aurangabad 431 008. |
| २. | K.R.D.H. Shikshan Prasarak Sanstha's Sahyadri college of Fire Engineering and Safety Management, Instt. Code. 1007 | Mumbai Agra Road, Behind Hotel Chhan, Mumbai Naka, Nashik-422009. | Survey No 493, Plot No. 204/A, Kanda Batata Sahkari Sangh, Mumbai Agra Road, Dwrka, Nashik-422011. |
| ३. | V.B.S.S. Indian Fire Service Engineering & Safety Management College, Instt. Code. 1401 | Plot No. 20, Rajyog, Vidyanagar, Jalna Road, 7 Hill, Aurangabad-431005. | Gut No. 45, Plot No 25,26,27,28, At Kumbhephal,Tal.Dist. Aurangabad-431201. |

२. सदर शासन निर्णय महाराष्ट्र शासनाच्या www.maharashtra.gov.in या संकेतस्थळावर उपलब्ध करण्यात आला असून त्याचा संकेतांक कमांक २०१७०४२५१५१४१८३००८ असा आहे. हा आदेश डिजीटल स्वाक्षरीने साक्षांकित करुन काढण्यात येत आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नावाने,

Anil Raghunath Katkar

Digitally signed by Anil Raghunath Katkar
DN: c=IN, o=Government Of Maharashtra, ou=Section Officer, postalCode=400032, st=Maharashtra, 2.5.4.20=c3fec0b0f5c05dc9058175992109e62d3f5719b9dfb87a96579dc30c265d67ce, serialNumber=2356d82c73e8a0c7b6da68b6511197206b94720842cda576febebf84581fc52a, cn=Anil Raghunath Katkar
Date: 2017.04.25 15:16:31 +05'30'

(अ. र. काटकर)
कार्यासन अधिकारी, महाराष्ट्र शासन.

**प्रति:-**

१) संचालक, महाराष्ट्र राज्य तंत्र शिक्षण मंडळ, मुंबई,
२) संचालक, तंत्र शिक्षण संचालनालय, महाराष्ट्र राज्य, मुंबई,
३) सहसंचालक, विभागीय कार्यालय, औरंगाबाद, नाशिक, (महाराष्ट्र राज्य तंत्र शिक्षण मंडळामार्फत),
४) संबंधित संस्था, (महाराष्ट्र राज्य तंत्र शिक्षण मंडळामार्फत),
५) निवड नस्ती (तांशि-५).